**नागन मध्यम प्रकल्प, ता. नवापुर, जि. नंदुरबार चतुर्थ सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**जलसंपदा विभाग**

**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०२१/३०४/(प्र.क्र.२११/२१)/मध्यम प्रकल्प**

मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

दिनांक:- २० मे २०२५

**पहावे:**

१) शासन निर्णय क्र.एन ए जी /१०८४ /३७० /(८१/८४)जसंअ - २ दि. १३/०८/१९८४

२) शासन निर्णय क्र.एन ए जी /१०९५ /२४२६ /(३५२/९५) जसंअ - २ दि. ०१/६/१९९८

३) तापाविम/कासं/प्रवि-४/सुप्रमा/२७/मप्र-२००४ दि.१६/८/२००४

४) शासन निर्णय क्र.सुप्रमा /२०/०६/१३३८ (३५८/०६) मप्र दिनांक २८/७/२००८

५) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव यांचे पत्र जा.क्र. कासं/तापाविम /प्रशा-२ /१९१०/सन-२०२१ दिनांक ०३/०५/२०२१

**प्रस्तावना** :-

नागन मध्यम प्रकल्प हा तापी पाटबंधारे विकास महामंडळातंर्गत आहे. हा प्रकल्प तापी खोऱ्यातील नंदुरबार जिल्ह्यातील नवापुर तालुक्यातील भरडू गावाजवळ नागन नदीवर बांधण्यात येत आहे. सदर प्रकल्पामुळे नंदुरबार जिल्ह्यातील नवापुर तालुक्यातील १६ गावांमधील २४८६ हे. क्षेत्रास सिंचनाचा लाभ उपलब्ध होणार आहे.

नागन मध्यम प्रकल्पातंर्गत तापी खोऱ्यातील नागन नदीवर एकूण २६.४८ दलघमी साठवण क्षमतेचे माती धरण सन २०१४ मध्ये बांधण्यात आलेले आहे. माती धरणाची एकूण लांबी २९४६ मी. असून महत्तम उंची ३०.०० मी. इतकी आहे

नागन मध्यम प्रकल्पास संदर्भ क्र. ०१ नुसार सन १९८३-८४ चे दरसूचीवर आधारीत रु. ७.०९ कोटी (सात कोटी नऊ लक्ष फक्त) इतक्या रकमेस मुळ प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. यानंतर सन १९९४-९५ चे दरसूचीवर आधारीत संदर्भ क्र. ०२ नुसार रू. ४९.५४ कोटी (रूपये एकोणपन्नास कोटी चोप्पन लक्ष फक्त) इतक्या किंमतीस प्रथम सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात आली. यांनतर संदर्भ क्र. ०३ नुसार सन २००२-०३ चे दरसूचीवर आधारीत रु.६२.८६ कोटी (रूपये बासष्ट कोटी शहाऐंशी लक्ष फक्त) इतक्या रक्कमेस द्वितीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली. यांनतर संदर्भ क्र.४ नुसार सन २००५-०६ चे दरसूचीवर आधारीत रु.९२.६२ कोटी (रूपये ब्याण्णव कोटी बासष्ट लक्ष फक्त) इतक्या रक्कमेस तृतीय सुधारीत प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली.

दरसूचीतील बदल, नवीन प्रस्तावित बाबी, अपु-या तरतुदी, इतर बाबी व अनुषंगिक खर्चात झालेली वाढ इत्यादी कारणांमुळे प्रकल्पाच्या किंमतीत वाढ झाल्यामुळे कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव यांनी सन २०२२-२३ च्या दरसुचीवर आधारीत रुपये १६१.१३ कोटी किंमतीचा चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव शासनास सादर केला होता.

या प्रकल्पाचा चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता छाननी अहवाल प्रस्ताव वित्त व नियोजन विभागाच्या सहमतीने मा. मंत्रीमंडळासमोर दि. ०१/०४/२०२५ रोजीच्या बैठकीत सादर केला असता त्यास मा. मंत्रीमंडळाची मान्यता प्राप्त झाली आहे.

मा. मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमत वाढीची कारणमीमांसा इ. बाबींचा परामर्श घेऊन नागन मध्यम प्रकल्प ता. नवापूर जि. नंदुरबार प्रकल्पाच्या सन २०२२-२३ दरसुचीवर आधारित रुपये १६१.१३ कोटी किंमतीच्या चतुर्थ सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

शासनाच्या या निर्णयाव्दारे नागन मध्यम प्रकल्प , ता.नवापुर जि. नंदुरबार प्रकल्पाच्या सन २०२२-२३ दरसुचीवर आधारित रुपये १६१.१३ कोटी (रुपये एकशे एकसष्ट कोटी तेरा लक्ष फक्त) किंमतीच्या चतुर्थ सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. त्यापैकी रुपये १५४.६० कोटी (रुपये एकशे चोपन्न कोटी साठ लक्ष फक्त) कामाप्रित्यर्थ तसेच आस्थापना व अनुषंगिक खर्चासाठी रुपये ६.५३ कोटी (रुपये सहा कोटी त्रेपन्न लक्ष फक्त) तरतूद आहे. उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा सोबत जोडण्यात येत आहे.

योजनेस प्रदान केलेली तृतीय सुधारित प्रशासकीय मान्यता मध्यम प्रकल्प कार्यासनाच्या नोंदवही मध्ये अनुक्रमांक ०३/२०२५ वर नोंदवण्यात आली आहे.

- **<u>चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे.</u>**

१) प्रकल्पाचा एकूण पाणीवापरानुसार राज्य एकात्मिक जल आराखड्यातील तरतूद सुधारित करण्यात यावी.

२) नलिकेद्वारे पाण्याचे वितरण या संदर्भात शासन निर्णय दि. १३/०१/२०१७ मध्ये तांत्रिक मान्यता देण्यास सक्षम अधिकाऱ्याने नलिका वितरण आराखड्यास व संकल्पचित्रास मान्यता द्यावी व प्रस्तावाची आर्थिक व्यवहार्यता तपासून कार्यकारी संचालक यांची मान्यता घ्यावी. त्याशिवाय सदर कामे हाती घेण्यात येऊ नये.

३) प्रकल्पाच्या उर्वरीत कामास सुरुवात करणेपूर्वी केंद्रीय जल आयोगाची मान्यता घेणेबाबतची कार्यवाही करावी.

४) सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व सुधारित प्रशासकीय मान्यता तरतुदीच्या मर्यादेत पुर्ण करण्यात यावे.

५) राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या छाननी अहवालातील उपस्थित सर्व मुद्यांची पूर्तता / अनुपालन करण्यात यावे.

६) सदर प्रकल्पासाठी कोणत्याही प्रयोजनार्थ मंजूर प्रशासकीय मान्यतेच्या मर्यादेबाहेर जाऊन, निधी वितरण अथवा अतिरिक्त खर्च न करणेची जवाबदारी महामंडळाची राहील.

७) प्रकल्पासाठी आवश्यक वैधानिक व तांत्रिक मान्यता सक्षम स्तरावर घेण्यात याव्यात.

८) सुधारीत प्रशासकीय मान्यता म्हणजे अहवालातील तांत्रिक बाबी अथवा निविदाविषयक क्षेत्रीय स्तरावरील निर्णयास किंवा झालेल्या क्षेत्रीय अनियमिततेस मान्यता गृहीत धरली जाणार नाही. अशा प्रकरणांची तपासणी त्यावेळी प्रचलित शासन निर्णयानुसार करणे आवश्यक असून याची सर्वस्वी जबाबदारी महामंडळाची राहील.

९) प्रकल्पाची अंमलबजावणी करतांना प्रचलित शासन निर्णय, नियम, CVC मार्गदर्शक तत्वे, वित्तीय अधिकार मर्यादा, विहित केलेली निविदा कार्यपध्दती याची काटेकोर अंमलबजावणी करणे, आवश्यकतेनुसार राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीने प्रकल्पाच्या व कामाच्या अनुषंगाने दिलेल्या निर्देशांचे व त्रुटींची पूर्तता करणे याची सर्वस्वी जवाबदारी महामंडळाची राहील.

१०) प्रकल्पासाठी आवश्यक असलेले "भूसंपादन" करुन "पुनर्वसनाबाबत" प्राधान्याने कार्यवाही करणे आवश्यक आहे. सदर भूसंपादन करत असताना भविष्यात न्यायालयीन प्रकरणे निर्माण होणार नाहीत किंवा उद्धवणार नाहीत याबाबत योग्य ती खबरदारी घेण्यात यावी.

११) उपलब्ध निधीचे Thin Spreading टाळणेचे दृष्टीने प्रकल्प घटकांच्या बांधकामावरील गुंतवणुकीचा प्राधान्य क्रम निश्चित करून त्यानुसारच कामे करावीत.

१२) पूर्ण झालेल्या घटक कामांचे घटक निहाय समाप्ती अहवाल तयार करुन सदर कामे तात्काळ व्यवस्थापनास हस्तांतरीत करावीत.

१३) शासनाने आदेशित केल्यानुसार Technical Audit करण्यात यावे.

१४) सदर प्रकल्पावर लाभधारकांची पाणी वापर संस्था स्थापन करण्यात यावी.

१५) Project Management Unit (PMU) व Dashboard स्थापन करणेबाबत व प्रकल्प विहित वेळेत पूर्ण होण्याच्या दृष्टीने कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय नियोजन व वित्त सहमतीने मा. मंत्रीमंडळाच्या दि. ०१/०४/२०२५ रोजी झालेल्या बैठकीमधे घेण्यात आलेल्या निर्णयानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या प्रकल्पाच्या कामावर होणारा खर्च मुख्य लेखाशीर्ष आय-५, ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधारे प्रकल्प या वरील भांडवली खर्च, १९०-सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका (०२) योजनांतर्गत, (०२) (०४) तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव भाग भांडवली अंशदान (४७०१-एच) या लेखा शिर्षाखाली टाकावा व त्या खालील मंजुर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णयाची अंमलबजावणी निर्गमित दिनांकापासून करण्यात यावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०५२०१७५५२६२३२७ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**सहपत्र :- उपशीर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2025.05.20 17:57:15 +05'30'

**(प्रविण कोल्हे)**
**शासनाचे उप सचिव**

**प्रत, सहपत्रांसह :-**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री महोदयांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा.मंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
४) मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
५) मा.मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
६) अपर मुख्य सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
७) अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
८) अपर मुख्य सचिव (नियोजन), नियोजन विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
९) सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१०) सचिव (प्रकल्प समन्वय), जलसंपदा विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
११) महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/ लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.

१२) कार्यकारी संचालक, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगांव
१३) मुख्य अभियंता (द.व प्र) व सह सचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) मुख्य अभियंता, तापी पाटबंधारे विकास महामंडळ, जळगाव
१५) उप सचिव (मो.प्र-१/मो.प्र-२/जसं/निवसं/सिंव्य/लाक्षेवि/लपा/जवि), यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) आंतर वित्त सल्लागार व उप सचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) अधीक्षक अभियंता, धुळे पाटबंधारे प्रकल्प मंडळ, धुळे.
१८) कार्यकारी अभियंता, नंदुरबार मध्यम प्रकल्प विभागीय पथक नंदुरबार.
१९) वित्त विभाग (व्यय-१२/अर्थ-०२/अर्थ-१०/व्यय-६ अ), मंत्रालय, मुंबई.
२०) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मुंबई.
२१) मध्यम प्रकल्प कार्यासन संग्रहार्थ.

**उप शिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा**
**नागन मध्यम प्रकल्प , ता.नवापुर,जि. नंदुरबार**
**शासन निर्णय क्रमांक :- सुप्रमा-२०२१/३०४/(प्र.क्र.२११/२१)/मध्यम प्रकल्प**
**दिनांक:- २० मे २०२५ चे सहपत्र.**

**(किंमत रुपये कोटी)**

| अ.क्र. | उपशिर्ष | मंजूर तृतीय प्रमा नुसार (दरसूची २००५-२००६) | प्रस्तावित चतुर्थ सुप्रमा नुसार (दरसूची २०२२-२३) | वाढ/घट |
|---|---|---|---|---|
| **A** | **शिर्षकामे** | | | |
| १ | A - Preliminary | ०.३२ | ०.२२ | -०.१ |
| २ | B - Land | २.९८ | ३.९८ | १.०० |
| ३ | C - Works | ५४.९२ | ७०.२८ | १५.३६ |
| ४ | D - Regulator | १.२१ | २.११ | ०.९ |
| ५ | K - Building | ०.४ | ०.४७ | ०.०७ |
| ६ | M - Plantation | ०.०१ | ०.०२ | ०.०१ |
| ७ | O - Miscellaneous | ०.८९ | १.५६ | ०.६७ |
| ८ | P - Maintenance | ०.७२ | १.०७ | ०.३५ |
| ९ | Q - Special T & P | ०.०९ | ०.०७ | -०.०२ |
| १० | R - Communication | ०.०९ | ०.५९ | ०.५ |
| ११ | Y - Losses | ०.१५ | ०.१९ | ०.०४ |
| | **एकूण(A):** | **६१.७८** | **८०.५६** | **१८.७८** |
| **(B)** | **कालवे व वितरण व्यवस्था** | | | |
| १ | A - Preliminary | ०.५१ | ०.४३ | -०.०८ |
| २ | B - Land | ०.६६ | ३.३७ | २.७१ |
| ३ | C - Works | ०.३३ | ०.९९ | ०.६६ |
| ४ | D - Regulator | ०.१७ | ०.४५ | ०.२८ |
| ५ | E - Fall | ०.०९ | ०.७१ | ०.६२ |
| ६ | F - C.D. works | ३.३१ | १०.६३ | ७.३२ |
| ७ | G - Bridges | ०.७७ | १.६० | ०.८३ |
| ८ | H - Escape | ०.०३ | ०.०३ | ०.०० |
| ९ | L - Earthwork | १.६६ | १.३३ | -०.३३ |
| १० | M - Plantation | ०.०६ | ०.०१ | -०.०५ |
| ११ | O - Miscellaneous | ०.२ | ०.०१ | -०.१९ |
| १२ | P - Maintenance | ० | ०.५४ | ०.५४ |
| १३ | Q - Special T & P | ०.०३ | ०.०० | -०.०३ |
| १४ | R - Communication | ०.०२ | ०.०० | -०.०२ |
| १५ | Cost of III rd Distry | ४.८३ | ४१.८१ | ३६.९८ |
| १६ | V-Water courses & FC | ०.०१ | ०.०० | -०.०१ |
| १७ | W-Drainage | ०.०१ | ०.०० | -०.०१ |

| अ.क्र. | उपशिर्ष | मंजूर तृतीय प्रमा नुसार (दरसूची २००५-२००६) | प्रस्तावित चतुर्थ सुप्रमा नुसार (दरसूची २०२२-२३) | वाढ/घट |
|---|---|---|---|---|
| १८ | R३-CAD | ० | ११.९९ | **११.९९** |
| १९ | Y - Losses | ०.०३ | ०.१५ | ०.१२ |
| | **एकूण(B):** | **१२.७२** | **७४.०४** | **६१.३३** |
| | **एकूण बांधकामे (A+B):** | **७४.५** | **१५४.६** | **८०.११** |
| | ईटीपी चार्जेस | १८.१२ | ६.५३ | -११.६ |
| | **प्रकल्प एकूण :** | **९२.६२** | **१६१.१३** | **६८.५१** |

**ठळक बाबी :-**

अ) या योजनेचे सिंचन क्षेत्र (ICA) २४८६ हेक्टर आहे.

ब) लाभव्यय गुणोत्तर – १.५५ > १.५०

PRAVIN SHIVAJI KOLHE

Digitally signed by PRAVIN SHIVAJI KOLHE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, 2.5.4.20=d3179b092692e5a493ad13c482974ccf422b154ad3219b12b5a56d8ec2ed058e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=A5CAFEFCF97B7EE559404B1081AE6CC80B0710E3FC3826245F60E43248C12F10, cn=PRAVIN SHIVAJI KOLHE
Date: 2025.05.20 17:57:50 +05'30'

**(प्रविण कोल्हे)**
**शासनाचे उप सचिव**